**मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील शिंदेवाडी न्यायालय, विलेपार्ले न्यायालय व बालन्यायालय, डोंगरी या न्यायालयाकरीता स्थायी अग्रीमेच्या रकमेस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:अग्रीम ०४२३/प्र.क्र.८८/कार्यासन ११**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ मार्च, २०२४

**वाचा:**

१.विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.पीएलए १२१४/१२०८/२२७/कार्यासन ११, दि.२७/१/२०२१
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.मआख २०११/प्र.क्र.१९/२०११/विनियम, दि.८/५/२०१४
३.विधि व न्याय विभाग, शासन ज्ञापन क्र.अग्रिम १२१४/११६७/प्र.क्र.२२४/ कार्यासन ११,दि.१३/३/२०१५
४.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांचे पत्र क्र.३०/२०२४, दि.९/१/२०२४

**प्रस्तावना :**

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील एकूण १३ केंद्रासाठी सं.क्र.३ येथील दि.१३/३/२०१५ च्या ज्ञापनात दर्शविल्यानुसार एकूण रु.२९,०००/- एवढे स्थायी अग्रीम मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यानंतर त्यांच्या अधिपत्याखालील शिंदेवाडी न्यायालय, विलेपार्ले न्यायालय व बालन्यायालय, डोंगरी या न्यायालयात स्वीय प्रपंजी खाते उघडण्यास संदर्भ क्र.१येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सं.क्र.३ येथील पत्रान्वये त्यांच्या अधिपत्याखालील सदर तीन केंद्रांकरीता स्थायी अग्रिमांच्या रक्कमेस मान्यता देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार सदर केंद्रांकरीता स्थायी अग्रीमेच्या रकमेस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील शिंदेवाडी न्यायालय, विलेपार्ले न्यायालय व बालन्यायालय, डोंगरी या तीन न्यायालयांकरीता प्रत्येकी रु.२०००/- इतक्या स्थायी अग्रिमेच्या रकमेस याद्वारे मा्न्यता देण्यात येत आहे.

२. याबाबत होणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान,(००) १०७ इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये, (००), (००) (०१) इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (अनिवार्य) (२०१४ ०२३४)" १३- कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.मआख २०११/प्र.क्र.१९/२०११/विनियम, दि.८/५/२०१४ अन्वये तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम-भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग-दोन अनुक्रमांक १२, नियम क्र. ५६ अन्वये प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१८१२४४१८२६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2024.03.18 12:53:22 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत:**

१) प्रबंधक (निरीक्षणे- २), उच्च न्यायालय, मुंबई.

२) मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा)महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,

५) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

७) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

८) वित्त विभाग/ व्यय ५/ कोषा ४, विनियम,मंत्रालय, मुंबई.

९) कक्ष अधिकारी कार्यासन २३ व२४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती (कार्यासन ११)